**नागरी संरक्षण संचालनालयातील वैद्यकिय अधिकारी (गट अ) हे पद पुनरुज्जीवीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सीडीएम २०१९/प्र.क्र.१८०/विशा-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२०

वाचा : १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. असंक १००१/प्रक्र२९/२००१/वित्तीय सूधारणा दिनांक १०.९.२००१
२) नागरी संरक्षण संचालनालयाचे पत्र क्र नासंसं/का-२(३)/प्रक्र२३/खंड-२/२०१९/१०१८, दिनांक ६.१२.२०१९

**प्रस्तावना:-**

नागरी संरक्षण संचालयामधील वैद्यकिय अधिकारी (गट अ) (वेतनस्तर एस-२३ रु ६७७००-२०८७००) हे पद पदे दिनांक ३.१.२०१७ पासून रिक्त झाले. सदर पदावर डॉ. श्रीमती ममता पणतुल्ला वैद्यकिय अधिकारी (गट अ) ह्या दि. ३.९.२०१९ पासून रुजू झाल्या आहेत. सदर पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त राहिल्याने उपरोक्त संदर्भ क्र १ येथील शा.नि., वित्त विभाग दिनांक १०.९.२००१ मधील तरतूदीनुसार व्यपगत झाले आहे. नागरी संरक्षण संचालनालयाचे संदर्भ क्र २ येथील पत्र, दिनांक ०६.१२.२०१९ अन्वये हे पद पुनरुज्जीवीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला. त्याअनुषंगाने हे पद पुनरुज्जीवीत करण्याचा प्रस्ताव शा.नि. वित्त विभाग दिनांक १०.९.२००१ अन्वये गठीत करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १७.०७.२०२० रोजी झालेल्या बैठकीत ठेवण्यात आला. उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सदर पदाबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

नागरी संरक्षण संचालयाच्या आस्थापनेवरील वैद्यकिय अधिकारी (गट अ) (वेतनस्तर एस-२३ : रु. ६७,७०० -- २,०८,७००) हे व्यपगत पद दि. ०३.०९.२०१९ पासून पुनरुज्जीवीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहेत.

२. संचालक, नागरी संरक्षण संचालनालय यांनी सदर पद पुनरुज्जीवीत केल्यामुळे या पदाच्या वेतनावर होणाऱ्या खर्चासंदर्भात व्यय अग्रक्रम समितीच्या मान्यतेसाठी पूरक मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शा.नि. दिनांक १०.९.२००१ अन्वये गठीत उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १७.७.२०२० रोजी झालेल्या बैठकीत झालेल्या निर्णयास अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३०/आ.पु.क., दि. ११.९.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९३०१५२०२१८९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak Vasant Sawant

Digitally signed by Deepak Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=43cdfecb6fd26ff7b1b970520962ebf72d86546b92151214820b2bb31f3ccac8, cn=Deepak Vasant Sawant
Date: 2020.09.30 17:00:46 +05'30'

**( दि.व. सावंत )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-८/ अर्थसं-११/ आपुक), मंत्रालय, मुंबई ४००० ३२.
८. निवड नस्ती, विशा-८, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.